**<u>सन २००९ च्या उन्हाळयात ग्रामीण व नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांना मुदतवाढ देण्याबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांक : टंचाई-१००९/प्र.क्र.१०९/पापु-१४**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक : २९ ऑगस्ट, २००९**

**वाचा :**

१. शासन निर्णय क्रमांक- टंचाई-३०९९/प्र.क्र.१३/पापु-१४ दिनांक ०१ फेब्रुवारी १९९९
२. शासन निर्णय क्रमांक- टंचाई-२०९९/प्र.क्र.१४/पापु-१४ दिनांक ०२ फेब्रुवारी १९९९
३. शासन निर्णय क्रमांक - टंचाई-१०९९/प्र.क्र.१२/पापु-१४ दिनांक ०३ फेब्रुवारी १९९९
४. शासन निर्णय क्रमांक- टंचाई-१००९/प्र.क्र.१६/पापु १४ दिनांक २९ एप्रिल,२००९
५. शासन निर्णय क्रमांक- टंचाई-१००९/प्र.क्र.१६/पापु १४ दिनांक २५ जून २००९
६. शासन निर्णय, क्रमांक- टंचाई-१००९/प्र.क्र.१६/पापु १४ दिनांक ३० जुलै २००९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

संदर्भाधीन दि.२ फेब्रुवारी,१९९९ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील नागरी भागामध्ये व दि. ३ फेब्रुवारी,१९९९ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण भागामध्ये पाणी टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांसाठी स्थायी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदर स्थायी आदेशानुसार पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजना दि. ३० जून पर्यंत राबविण्यात येतात.

चालू वर्षी राज्यातील काही जिल्हयांमध्ये आतापर्यंत सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झाले असल्याने पाणी टंचाईची परिस्थिती अजूनही कायम आहे. सदर बाब लक्षात घेता, राज्यातील सर्व जिल्हयात पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांसाठी मुदतवाढ देण्याचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता, **राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये ग्रामीण भागात व नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ उपाययोजना घेण्यास <u>दि. ३० ऑक्टोबर, २००९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.</u>**

२. तसेच पाणी टंचाई असलेल्या ग्रामीण भागात, ज्या ठिकाणी पाणी टंचाई कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या इतर उपाययोजना घेणे शक्य नसतील, तेथे संबंधित आमदारांच्या अध्यक्षतेखालील समितीने शिफारस केलेल्या गावास/वाडीस **टँकर/बैलगाडीने पाणी पुरवठा करण्यास मंजूरी देण्याचे अधिकार, <u>संबंधित तहसिलदार</u> यांना**

स्थायी आदेशानुसार, विहित अटींचे काटेकोरपणे पालन करण्याच्या अटीवर, **दि.३० ऑक्टोबर, २००९ पर्यंत प्रदान करण्यात येत आहेत.**

३. सर्व जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, तसेच वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा यांनी या पावसाळयात झालेल्या पर्जन्यमानामुळे भूजलाच्या झालेल्या पुर्नभरणाचा आढावा घेऊन व विश्लेषण करुन , पाणी टंचाई निर्माण झालेल्या गावे /वाडयांमध्ये तसेच नागरी क्षेत्रात आवश्यकतेनुसार स्थानिक परिस्थिती व स्त्रोतांचा विचार करुन खरोखर गरजेच्या आधारे पाणी टंचाई निवारणार्थ किमान खर्चाच्या उपाययोजना घेण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२००९०८२९१३३१०९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**(सु.वि.कोळेकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
१) विभागीय आयुक्त, (सर्व),
२) जिल्हाधिकारी (सर्व )
३) आयुक्त, महानगरपालिका, (सर्व )
४) महालेखापाल-१ / २ (लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर.
५) महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर.
६) प्रधान सचिव ( म.व. व पु. ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई ,
११) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३) जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व ).
१४) तहसिलदार (सर्व)
१५) मुख्याधिकारी, नगरपालिका ( सर्व )
१६) विभागीय उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा ( सर्व ).
१७) कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१८) पापु-१४ संग्रहासाठी.